नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या रूग्णालय व प्राथमिक आरोग्य केंद्रातून श्वानदंशावरील लस मोफत देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- संकिर्ण-२०१६/प्र.क्र.४२९/नवि-२०**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक:- ०५ नोव्हेंबर, २०१६.**

**शासन परिपत्रक:-**

सन-२००८ च्या दुसऱ्या (पावसाळी) अधिवेशनात सर्वश्री. प्रा. राजू तिमांडे व इतर विधान सभा सदस्य यांनी "एक्सपायरी डेट जवळ आलेल्या ॲन्टी रॅबीज व्हॅक्सींग लसीची मोठ्या प्रमाणावर झालेली खरेदी" या विषयाबाबत उपस्थित केलेल्या लक्षवेधी सूचनेच्या वेळी सन्माननीय विधान सभा सदस्य श्री. संतोष चौधरी व श्री. सरदार दारासिंह यांनी "ए.आर.व्ही.लस(श्वानदंश प्रतिबंधक लस) नगरपरिषद, नगरपालिका व महानगरपालिकेच्या हद्दीतील तसेच मुंबईतील रूग्णालयामध्ये देखील मोफत देण्यात येईल काय?" अशी विचारणा केली असता त्यावर तत्कालीन मा. मंत्री (सा.आ.व कु.क.) यांनी "तशा सूचना महापालिका व वैद्यकीय शिक्षण विभाग या दोन्ही विभागास देण्यात येतील" असे, आश्वासन (क्र. १०४६) दिलेले आहे. सदर आश्वासनाची पूर्तता करताना सार्वजनिक आरोग्य विभागाने दि. १५.०९.२०१४ च्या अर्धशासकिय पत्रान्वये नगर विकास विभागास दिल्या असल्याबाबत विधान मंडळ सचिवालयास कळविले आहे. या पार्श्वभूमीवर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या रूग्णालय व प्राथमिक आरोग्य केंद्रातून श्वानदंशावरील लस मोफत देण्याबाबत सूचना प्रसारित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. उपरोक्त पार्श्वभूमीवर राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या रूग्णालय व प्राथमिक आरोग्य केंद्रातून श्वानदंशावरील लस मोफत देण्याबाबत आवश्यक कार्यवाही तात्काळ करावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१६११०५१६४८५३७४२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2016.11.05 16:51:17 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) प्रधान सचिव-१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, गो.ते. रूग्णालय आवार, १० वा मजला, मुंबई-४०० ००१
७) सचिव-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) आयुक्त, सर्व महानगरपालिका
९) आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१०) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगर पंचायत (सर्व)
११) निवडनस्ती (नवि-२०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई